**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात इंग्रजी माध्यमांच्या आश्रमशाळांचे बांधकाम या योजनेसाठी निधी वितरण (लेखाशिर्ष ४२२५ ०५३२)**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२२/ प्र.क्र.६०/ कार्यासन-६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : ३१ मार्च, २०२३.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२ /प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२, दि.०८.०२.२०२३ व दि.१६.३.२०२३.
२) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.स्कूल-२०१९/प्र.क्र.१९/का.६(७)/१९५५, दि.२१.३.२०२३.
३) आदिवासी विकास विभाग नस्ती क्र. शाआशा-२०१९/प्र.क्र.३२५(भाग-१)/कार्या १३-अ.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत एकलव्य मॉडेल निवासी शाळा, बोरगाव बाजार, जि.गोंदिया व एकलव्य मॉडेल निवासी शाळा, अहेरी, जि.गडचिरोली येथील बांधकामांसाठी इंग्रजी माध्यमांच्या आश्रमशाळांचे बांधकाम (लेखाशिर्ष ४२२५०५३२) या योजनेसाठी रु.९००.०० लाख इतका निधी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून वितरणासाठी वितरीत करण्याबाबत आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्याकडून निधी वितरणाचा प्रस्ताव प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावास संदर्भाधीन क्र.३ येथील नस्तीवर वित्त विभागाच्या प्राप्त झालेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रम अंतर्गत मागणी क्र.टी-६ मधील ४२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण यावरील भांडवली खर्च या मुख्य लेखाशीर्षाखाली जनजाती उपयोजना क्षेत्राकरीता **इंग्रजी माध्यमांच्या आश्रमशाळांचे बांधकाम** या योजनेअंतर्गत १) एकलव्य मॉडल रेसिडेंशीयल स्कुल, बोरगाव बाजार जि.गोंदीया २) एकलव्य मॉडल रेसिडेंशीयल स्कुल , अहेरी जि.गडचिरोली या कामांसाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या सुधारित अंदाजाच्या मर्यादेत खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु. लाखात)**

| योजना | लेखाशीर्ष | बाब | सन २०२२-२३ साठी सुधारीत अंदाज | यापूर्वी वितरीत निधी | सदर शा. नि. अन्वये वितरीत येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| **इंग्रजी माध्यमांच्या आश्रमशाळांचे बांधकाम** | ४२२५ ०५३२ | ५३, मोठी बांधकामे | २०००.०० | ९०५०.०० | ९००.०० |

२. उपरोक्त प्रमाणे एकूण **रु.९००.०० लाख (अक्षरी रुपये नऊ कोटी फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक** यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

५. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन परिपत्रकांन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारात व अनौपचारीक संदर्भ क्र.३६५-२३/व्यय-१४, दि.२८.०३.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३३१२२३०५१४०२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.04.17 13:50:31 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अप्पर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. कार्यासन क्र. १३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
९. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.